**राज्यातील उर्वरित २८ जिल्ह्यातील भूमापन नकाशांचे डिजीटायझेशनचे काम करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ-२०२४/प्र.क्र.१९७/ल-१**
**पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२**
तारीखः ३१ मार्च, २०२५

**वाचा -**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः संकीर्ण १०११/२१०३/प्र.क्र.६१८/ल-१, दि.०६.१०.२०१५.

२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः रा.भू.२०१६/प्र.क्र.९९/ल-१, दि. ३१.०३.२०१७

३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः रा.भू.२०१७/प्र.क्र.१२८/ल-१,दि. १४.०१.२०२२.

४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः राभूअ-२०२४/प्र.क्र.१९७/ल-१,दि. १४.१०.२०२४.

५) जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे यांचे कडील क्र.पु.मो.१/ प्र.क्र.१०९/२०२५, दि.०७.०१.२०२५ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना -**

वाचा क्र. १ डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमातंर्गत महसूल व वन विभाग यांचेकडील शासन निर्णय दि.०६/१०/२०१५ अन्वये राज्यातील एकूण १३ प्रकारच्या भूमापन नकाशांचे डिजीटायझेशनचे काम करणेबाबत मान्यता देण्यात आलेली आहे. भूमी अभिलेख विभागाकरिता "राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्यातील २८ जिल्ह्यातील भूमापन नकाशाचे डिजीटायजेशन करण्यासाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु. ३,०४,६१,९८२/- इतका निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्यानुसार रु. ३,०४,६१,९८२/- इतका निधी जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

भूमी अभिलेख विभागाकरिता "राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्यातील २८ जिल्ह्यातील भूमापन नकाशाचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु. ३,०४,६१,९८२/- (रुपये तीन कोटी, चार लक्ष, एकसष्ट हजार नऊशे ब्याऐंशी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१. राज्यातील भूमी अभिलेख विभागाकरिता "राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्यातील २८ जिल्ह्यातील भूमापन नकाशाचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु. ३,०४,६१,९८२/- (रुपये तीन कोटी, चार लक्ष, एकसष्ट हजार नऊशे ब्याऐंशी फक्त) इतका निधी प्राप्त होणाऱ्या देयकानुसारच आहरित करून खर्च करण्यात यावा.

२. वर्षाअखेर कोणताही निधी अखर्चित राहणार नाही. चालू आर्थिक वर्षातील वितरीत निधी अखर्चित राहिल्यास तो दि. ३१.०३.२०२५ रोजी शासनास सर्मपित करणे आवश्यक आहे.

३. सदर खर्च करताना वित्त विभागाने निधी वितरणाच्या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या निर्देशांनुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र. १ सी, २०२९ ज़मीन महसूल २१०२, सर्व्हेक्षण व इतर जमाबंदीची कामे, (००) (११), जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) (डिजीटायझेशन) २०२९०८८८ (१०) कंत्राटी सेवा (योजनातंर्गत)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९८/व्यय-१०, दिनांक २९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११६२२४५७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.31 16:24:16 +05'30'

(संजय बनकर)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री [नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.)] यांचे सचिव

४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त, नियोजन, राजु उत्पादन शुल्क) यांचे सचिव.

५. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव

६. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव

७. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव.

८. सर्व विभागीय आयुक्त.

९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.

१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.

१३. कोषागार अधिकार, पुणे.

१४.वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई.

१५.निवड नस्ती, ल-१.